बोर व्याघ्र राखीव क्षेत्राचे एकसंघ (Unified Control) नियंत्रणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डब्लूएलपी-०८१५/प्र.क्र.२६१/फ-१,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- ०३ जुलै, २०२३.

वाचा :- १. महसूल व वन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक, डब्लूएलपी-०११४/प्र.क्र.२६/फ-१, दिनांक १६.०८.२०१४.

१. महसूल व वन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक, डब्ल्यूएलपी-०८१५/प्र. क्र. २६१/फ-१, दिनांक ०४.१२.२०१५.

२. राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरण, पर्यावरण वने व वातावरण बदल मंत्रालय, केंद्र शासन नवी दिल्ली यांचे पत्र क्र. १५-२२/२०१६-NTCA, दिनांक २४.५.२०१६

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २३(२)/वजी/सर्व्हे/प्र. क्र.११०/२१८/२०२२-२३ नागपूर, दिनांक २१.०४.२०२३.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्यात एकूण ६ व्याघ्र राखीव क्षेत्र घोषित करण्यात आलेले असून, त्यापैकी बोर व्याघ्र प्रकल्प वगळता इतर ५ व्याघ्र राखीव क्षेत्रांचे नियंत्रण करण्यासाठी स्वतंत्र क्षेत्र संचालक आहेत. राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांच्या मार्गदर्शक तत्वानुसार व्याघ्र प्रकल्पाचे बफर क्षेत्राचे एकसंघ नियंत्रण (Unified Control) असणे गरजेचे आहे. सन २०१८ व २०२२ मध्ये झालेल्या Management Effectiveness Evaluation नंतर बोर व्याघ्र प्रकल्पाचे बफर क्षेत्र एकसंघ नियंत्रणाखाली अंमलात आणण्याच्या सूचना प्राप्त झाल्या आहेत.

संदर्भ क्र. १ च्या अधिसूचने अन्वये वर्धा व नागपूर जिल्ह्यातील १३८.१२ चौ.कि.मी. क्षेत्र बोर व्याघ्र प्रकल्पाचे कोअर क्षेत्र म्हणून अधिसूचित करण्यात आले आहे. तसेच संदर्भ क्र. २ च्या अधिसूचने अन्वये वर्धा व नागपूर जिल्ह्यातील ६७८.१४ चौ.कि.मी. क्षेत्र बोर व्याघ्र प्रकल्पाचे बफर क्षेत्र म्हणून अधिसूचित करण्यात आले आहे. सदर क्षेत्रापैकी कोअर क्षेत्रावर वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर तसेच बफर क्षेत्रातील काही भागावर उप वनसंरक्षक, वर्धा व नागपूर यांचे प्रशासकीय नियंत्रण आहे. बोर व्याघ्र राखीव क्षेत्राच्या प्रभावी व्यवस्थापनासाठी प्रादेशिक वनविभागाकडे असलेले बफर स्वतंत्र क्षेत्र संचालक यांचे नियंत्रणाखाली आणणे आवश्यक आहे.

याद्दष्टीने बोर व्याघ्र राखीव क्षेत्राचे प्रभावी व्यवस्थापन व प्रशासकीय नियंत्रणाकरीता बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यास्तव उपरोक्त बाबींचा विचार करून बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रण खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

बोर व्याघ्र राखीवचे व्यवस्थापन व प्रशासकीय नियंत्रण अधिक प्रभावीपणे करण्याच्या उद्देशाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

१. नागपूर प्रादेशिक वन विभाग (२२६.१५ चौ.कि.मी.) व वर्धा प्रादेशिक वन विभाग (४५१.९९ चौ.कि.मी.) यांचे अधिनस्त असलेले बोर व्याघ्र प्रकल्पाचे बफर क्षेत्राचे व्यवस्थापन बोर व्याघ्र प्रकल्पाच्या नियंत्रणाखाली आणण्यात येत आहे.

२. वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर हेच बोर व्याघ्र प्रकल्पाचे कामकाज पाहतील. त्यांचे अधिनस्त बोर व्याघ्र प्रकल्पाचे एकसंघ नियंत्रणाकरीता उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प हे काम पाहतील व त्यांचे मुख्यालय वर्धा येथे राहील. बोर व्याघ्र प्रकल्पाचे एकसंघ नियंत्रणाअंतर्गत उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा यांचे अधिनस्त वनपरिक्षेत्राचा तपशील तक्ता क्र. १ मध्ये नमूद आहे.

**तक्ता क्रमांक १**

(क्षेत्र चौ.कि.मी.)

| **विभाग/ मुख्यालय** | **उपविभाग/ मुख्यालय** | **वनपरी क्षेत्र** | **मुख्यालय** | **राखीव वन** | **संरक्षित वन** | **झुडपी जंगल** | **अवर्गीकृत वन** | **वनेत्तर क्षेत्र** | **एकुण क्षेत्र** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उप संचालक बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा | सहाय्यक वनसंरक्षक (कोअर), बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा | बोरधरण | बोरधरण | ४३.४० | ११.१० | ०.०० | ६.६० | ०.०० | ६१.१० |
| | | नविन बोर | बोरधरण | ७१.०५ | ०.०० | ०.०० | ०.०० | ५.९७ | ७७.०२ |
| | | कवडस (बफर क्षेत्र) | कवडस | ५५.२७ | ३३.०६ | ०.१० | ०.०० | १३७.७२ | २२६.१५ |
| | सहाय्यक वनसंरक्षक (बफर), बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा | हिंगणी (बफर क्षेत्र) | हिंगणी | ८६.२१ | ४२.७२ | ४.६२ | ०.०० | १६७.४३ | ३००.९८ |
| | | बांगडापूर (बफर क्षेत्र) | बांगडापूर | ११७.५३ | १५.७८ | ०.५४ | ०.०० | १७.१६ | १५१.०१ |
| **एकूण** | | | | **३७३.४६** | **१०२.६६** | **५.२६** | **६.६०** | **३२८.२८** | **८१६.२६** |

३. नागपूर वन विभागाचे १३५९.७५ चौ.कि.मी. क्षेत्रामधून बोर व्याघ्र प्रकल्प, एकसंघ नियंत्रणाकरिता ८८.४३ चौ.कि.मी. वनक्षेत्र हस्तांतरीत केल्यानंतर नागपूर वन विभागाकडे उर्वरीत असलेल्या १२७१.३२ चौ.कि.मी. क्षेत्राच्या पुर्नरचनेचा तपशील तक्ता क्र. २ मध्ये नमूद आहे.

**तक्ता क्रमांक २**

(क्षेत्र चौ.कि.मी.)

| अ. क्र. | वनपरिक्षेत्र | राखीव वन | संरक्षित वन | झुडपी जंगल | अवर्गीकृत वन | वनेत्तर क्षेत्र (C.A. अंतर्गत प्राप्त झालेले) | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | नरखेड | ५१.३३ | ५३.०७ | १२.४३ | ०.०० | ०.०० | ११६.८३ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | काटोल | २२.७९ | ५४.२३ | १८.०७ | ०.०० | ०.०० | ९५.०९ |
| ३ | कोंढाळी | ६१.५० | ६५.६३ | २.८८ | ०.०० | ०.०६ | १३०.०७ |
| ४ | हिंगणा | ३२.९६ | ३३.५० | ४०.२३ | ०.०० | ०.०० | १०६.६९ |
| ५ | उत्तर उमरेड | ९०.५८ | १५१.४६ | २५.७२ | ०.०० | ०.२० | २६७.९६ |
| ६ | दक्षिण उमरेड | ५६.४५ | ६४.०३ | ७.१५ | ०.०० | ०.०३ | १२७.६६ |
| ७ | सेमिनरी हिल्स | ८.२६ | ०.०० | ०.८२ | ०.२२ | ०.०० | ९.३० |
| ८ | कळमेश्वर | १८.५६ | १३.७९ | १६.६३ | ०.०० | ०.०७ | ४९.०५ |
| ९ | खापा | १२.६० | ३१.१९ | १५.०६ | ०.०० | ०.०० | ५८.८५ |
| १० | देवलापार | ९१.२५ | १३.४१ | ०.०० | ०.०० | ०.०० | १०४.६६ |
| ११ | पवनी | ९०.८४ | २५.४५ | ०.०० | ०.०० | ०.०० | ११६.२९ |
| १२ | रामटेक | १३.५८ | ५८.२८ | १५.८२ | ०.०० | ०.५१ | ८८.१९ |
| १३ | कामठी | ०.०० | ०.०० | ०.६८ | ०.०० | ०.०० | ०.६८ |
| **एकुण** | | **५५०.७०** | **५६४.०४** | **१५५.४९** | **०.२२** | **०.८७** | **१२७१.३२** |

४. वर्धा वन विभागाचे ९२६.९३ चौ.कि.मी. क्षेत्रामधून बोर व्याघ्र प्रकल्प, एकसंघ नियंत्रणाकरिता २६७.३९ चौ.कि.मी. वनक्षेत्र हस्तांतरीत केल्यानंतर वर्धा वन विभागाकडे उर्वरीत असलेल्या ६५९.५४ चौ.कि.मी. क्षेत्राच्या पुर्नरचनेचा तपशील तक्ता क्र. ३ मध्ये नमूद आहे.

**तक्ता क्रमांक ३**

(क्षेत्र चौ.कि.मी.)

| अ.क्र. | वनपरिक्षेत्र | राखीव वन | संरक्षीत वन | झुडपी जंगल | वनेत्तर क्षेत्र | खाजगी वन | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | वर्धा | ०.००० | ०.८२ | ५९.७२ | ०.०० | ०.०० | **६०.५४** |
| २ | समुद्रपुर | ४५.५१ | ११.८३ | २९.६२ | ०.०० | ०.८५ | **८७.८१** |
| ३ | हिंगणी | ३.७५ | ६४.३९ | १४.३५ | १.७८ | ०.३१ | **८४.५८** |
| ४ | आर्वी | ५५.२९ | ४३.०२ | ९.८९ | ३.७८ | ०.५३ | **११२.५१** |
| ५ | आष्टी | ५१.४७ | ७५.८१ | ८.२९ | ७.७३ | ०.०० | **१४३.३०** |
| ६ | तळेगाव | ४३.८५ | ३१.१२ | ६.६७ | ०.०० | ०.६४ | **८२.२८** |
| ७ | कारंजा | ३६.७१ | ३१.९३ | १९.७२ | ०.०० | ०.१६ | **८८.५२** |
| **एकुण क्षेत्र** | | **२३६.५८** | **२५८.९२** | **१४८.२६** | **१३.२९** | **२.४९** | **६५९.५४** |

५. बोर व्याघ्र राखीव क्षेत्राचे कोअर क्षेत्र १३८.१२ चौ.कि.मी. (१३८१२.१४ हे.), बफर क्षेत्र ६७८.१५ चौ.कि.मी. (६७८१४.४५९ हे) असे एकूण ८१६.२७ चौ.कि.मी. (८१६२६.५९९ हे.) क्षेत्राचे बोर व्याघ्र प्रकल्प एकसंघ नियंत्रणाअंतर्गत कोअर व बफर क्षेत्रातील वनपरिक्षेत्राचा तपशिल **परिशिष्ठ – १** मध्ये नमूद आहे.

६. बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणाकरीता नागपूर वन विभागाकडून हस्तांतरीत होणाऱ्या मालमत्तेचा तपशिल **परिशिष्ठ - २** मध्ये नमूद आहे.

७. वर्धा वन विभागाकडून हस्तांतरीत होणाऱ्या मालमत्तेचा तपशिल **परिशिष्ठ - ३** मध्ये नमूद आहे.

८. बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणाकरीता आवश्यक असलेल्या पदांचा संवर्गनिहाय तपशील **परिशिष्ठ - ४** मध्ये नमूद आहे.

९. बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणा अंतर्गत प्रशासकीय संरचनेचा तपशिल **परिशिष्ठ - ५** मध्ये नमूद आहे.

१०. बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणा अंतर्गत उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा यांचे अधिनस्त वनपरिक्षेत्र, परिमंडळ व नियतक्षेत्रनिहाय तपशिल **परिशिष्ठ - ६** मध्ये नमूद आहे.

११. नागपूर व वर्धा जिल्ह्यातील नागपूर व वर्धा वनविभागाकडील बफर क्षेत्र बोर व्याघ्र प्रकल्पाकडे वळती केल्यानंतर नागपूर व वर्धा प्रादेशिक वन विभागाचे शिल्लक राहणाऱ्या क्षेत्रासाठी नागपूर व वर्धा वन विभागाची पुनर्रचना करण्याबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अध्यक्षतेखाली अस्तित्वात असलेल्या उच्चस्तरीय समिती मार्फत निर्णय घेण्यात येईल.

१२. उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा यांचे कार्यालय व मुख्यालय वर्धा येथे स्थित राहील. सद्यस्थितीत विभागीय वन अधिकारी (वन्यजीव), बोर अभयारण्य, नागपूर हे उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा म्हणून कार्यरत राहतील. त्यांचे अधिनस्त सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव), कोअर क्षेत्र व सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव), बफर क्षेत्र हे कार्यरत राहतील.

१३. सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव), कोअर क्षेत्र यांचे अधिनस्त कार्यक्षेत्रात बोर, नविन बोर व कवडस या वनपरिक्षेत्रांचा समावेश असेल. वनपरिक्षेत्र अधिकारी (बफर), कवडस यांचे मुख्यालय कवडस येथे राहील. वनपरिक्षेत्र अधिकारी बोर व नविन बोर यांचे कार्यालय पूर्वीप्रमाणेच बोरधरण स्थित राहील.

१४. सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव), बफर क्षेत्र यांचे अधिनस्त कार्यक्षेत्रात बफर क्षेत्रातील बांगडापूर व हिंगणी या वनपरिक्षेत्राचा समावेश राहील. वनपरिक्षेत्र अधिकारी (बफर), बांगडापूर यांचे मुख्यालय बांगडापूर स्थित राहील. वनपरिक्षेत्र अधिकारी (बफर), हिंगणी यांचे मुख्यालय व कार्यालय हिंगणी स्थित राहील.

१५. वनपरिक्षेत्र अधिकारी, विशेष सेवा हे पद उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प यांचे कार्यालयात कार्यरत राहील व उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प यांचे निर्देशानुसार ते क्षेत्रीय व कार्यालयीन कामे करतील.

१६. विभागीय वन अधिकारी (वन्यजीव), बोर वन्यजीव अभयारण्य, नागपूर यांचे अधिनस्त सद्यस्थितीत कार्यरत असलेले सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव), उमरेड-पवनी-कऱ्हांडला वन्यजीव अभयारण्य हे उपसंचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर यांचे अधिनस्त कार्यरत राहतील व त्यांचे मुख्यालय नागपूर स्थित राहील.

१७. बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणाव्दारे प्राप्त क्षेत्रीय पदे ही वनपरिक्षेत्र, उपक्षेत्र व नियतक्षेत्र यामध्ये तसेच विशेष सेवा पदे ही आवश्यकतेनुसार तपासणी नाके, प्रवेशव्दार व काष्ठ आगार इत्यादी ठिकाणी व्यवस्थापन आराखडयाप्रमाणे वाटप करण्याची जबाबदारी क्षेत्र संचालक यांची राहील.

१८. बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणाकरीता वाहन चालक, शिपाई व चौकीदार या पदांकरीता आवश्यकतेनुसार कंत्राटी पध्दतीने सेवा उपलब्ध करून घेता येऊ शकेल.

१९. राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरण (NTCA) यांचे मार्गदर्शक सुचनेनुसार बोर व्याघ्र प्रकल्पाचा व्याघ्र संवर्धन आराखडा मंजुरीस्तव सादर करण्यात आला असुन सदर आराखडा राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरण (NTCA) कडून अंतिमत: मान्य होत नाही तो-पर्यंत वर्धा व नागपूर वन विभागाकडून वर्ग झालेल्या बफर क्षेत्राअंतर्गत मंजूर कार्यआयोजनेची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी ही उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा व क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर यांची राहील. बोर व्याघ्र प्रकल्पाचा व्याघ्र संवर्धन आराखडा राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरणाद्वारे (NTCA) मंजूर झाल्यानंतर त्यानुसारच बफर क्षेत्रातील कामे करणे अनुज्ञेय राहील.

२०. नागपूर व वर्धा वन विभागातील अधिसूचीत बफर क्षेत्रातील सद्यस्थितीत कार्यरत अधिसंख्य वनमजुर बोर व्याघ्र प्रकल्पाचे एकसंघ नियंत्रणा अंतर्गत वळती करण्यात यावे.

२१. सदरचे आदेश तात्काळ प्रभावाने अंमलात येतील.

२२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०४१२४५२७४८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH
TUKARAM
SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.07.04 12:47:04 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ, नागपूर.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर/पश्चिम, मुंबई
१०. विभागीय आयुक्त, नागपूर.
११. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), सर्व.
१२. क्षेत्र संचालक, व्याघ्र प्रकल्प, सर्व
१३. उपवनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) सर्व
१४.उपसंचालक, व्याघ्र प्रकल्प, सर्व
१५. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१६. वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

*****

**परिशिष्ठ - १:- बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणाअंतर्गत उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा यांचे अधिनस्त राहणाऱ्या वनपरिक्षेत्राचा तपशिल.**

(क्षेत्र चौ.कि.मी. मध्ये)

| **विभाग/ मुख्यालय** | **उपविभाग / मुख्यालय** | **वनपरीक्षेत्र** | **मुख्यालय** | **राखीव वन** | **संरक्षित वन** | **झुडपी जंगल** | **अवर्गीकृत वन** | **वनेत्तर क्षेत्र** | **एकुण क्षेत्र** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा | सहाय्यक वनसंरक्षक (कोअर), बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा | बोरधरण | बोरधरण | ४३.४० | ११.१० | ०.०० | ६.६० | ०.०० | ६१.१० |
| | | नविन बोर | बोरधरण | ७१.०५ | ०.०० | ०.०० | ०.०० | ५.९७ | ७७.०२ |
| | | कवडस क्षेत्र (बफर क्षेत्र) | कवडस | ५५.२७ | ३३.०६ | ०.१० | ०.०० | १३७.७२ | २२६.१५ |
| | सहाय्यक वनसंरक्षक (बफर), बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा | हिंगणी क्षेत्र (बफर क्षेत्र) | हिंगणी | ८६.२१ | ४२.७२ | ४.६२ | ०.०० | १६७.४३ | ३००.९८ |
| | | बांगडापूर (बफर क्षेत्र) | बांगडापूर | ११७.५३ | १५.७८ | ०.५४ | ०.०० | १७.१६ | १५१.०१ |
| | **वनपरिक्षेत्र अधिकारी, विशेष सेवा, बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा** | | वर्धा | ० | ० | ० | ० | ० | ० |
| **एकुण** | | | | **३७३.४६** | **१०२.६६** | **५.२६** | **६.६०** | **३२८.२८** | **८१६.२६** |

**परिशिष्ट - २:- बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणाकडे नागपूर वन विभागाकडून हस्तांतरीत होणाऱ्या मालमत्तेचा (Assets) तपशील.**

| अ. क्र. | वन विभागाचे नाव | विवरण | सविस्तर तपशील | मालमत्ता संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | उपवनसंरक्षक, नागपूर वन विभाग, नागपूर | ईमारत | क्षेत्र सहाय्यक निवासस्थान, अडेगाव | ०१ |
| २ | | | क्षेत्र सहाय्यक निवासस्थान, चौकी | ०१ |
| ३ | | | वनरक्षक निवासस्थान, नवेगाव | ०१ |
| ४ | | | वनरक्षक निवासस्थान, कवडस | ०१ |
| ५ | | | वनरक्षक निवासस्थान, चौकी | ०१ |
| ६ | | | वनरक्षक निवासस्थान, डेगमा बुज | ०१ |
| ७ | | निरिक्षण कुटी | कवडस निरीक्षण कुटी | ०१ |
| ८ | | | पेंढरी (नविन) निरीक्षण कुटी | ०१ |
| ९ | | | कान्होलीबारा (नविन) निरीक्षण कुटी | ०१ |
| १० | | तपासणी नाका | सावली (अस्थायी) | ०१ |
| | | एकूण | | १० |

**परिशिष्ठ - ३ :- बोर व्याघ्र प्रकल्प एकसंघ नियंत्रणाकडे वन विभाग वर्धा यांचेकडून हस्तांतरीत होणाऱ्या मालमत्तेचा (Assets) तपशील.**

| अ. क्र. | वन विभागाचे नाव | विवरण | सविस्तर तपशील | मालमत्ता संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | उपवनसंरक्षक, वर्धा वन विभाग, वर्धा | ईमारत | लिलावासाठी बांधलेले शेड मौजा बांगडापूर | ०१ |
| २ | | | स्वयंपाकगृह मौजा बांगडापूर (स्थित बांगडापूर डेपो) | ०१ |
| ३ | | | सार्वजनिक शौचालय मौजा बांगडापूर (स्थित बांगडापूर डेपो) | ०१ |
| ४ | | | वनपाल कार्यालय मौजा बांगडापूर (स्थित बांगडापूर डेपो) | ०१ |
| ५ | | | वनचेतना गृह, मौजा नांदोरा | ०१ |
| ६ | | | वनचेतना केंद्र, मौजा मरकसूर | ०१ |
| ७ | | | सार्वजनिक शौचालय, मौजा मरकसूर | ०१ |
| ८ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा गरमसूर वापरात असलेले | ०१ |
| ९ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा बोरखेडी, वापरात असलेले | ०१ |
| १० | उपवनसंरक्षक, वर्धा वन विभाग, वर्धा | ईमारत | वनपाल निवासस्थान Type-II Qtr. मौजा बोरखेडी, वापरात असलेले | ०१ |
| ११ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा बोरगांव (गोंडी), वापरात असलेले | ०१ |
| १२ | | | वनपाल निवासस्थान Type-II Qtr. मौजा बोरगांव (गोंडी), वापरात असलेले | ०१ |
| १३ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा मासोद, वापरात असलेले | ०१ |
| १४ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा मासोद (द.), वापरात असलेले | ०१ |
| १५ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा सेलडोह, वापरात नसलेले | ०१ |
| १६ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा रिधोरा, वापरात नसलेले | ०१ |
| १७ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा चांदणी, वापरात नसलेले | ०१ |
| १८ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा | ०१ |

| अ. क्र. | वन विभागाचे नाव | विवरण | सविस्तर तपशील | मालमत्ता संख्या |
|---|---|---|---|---|
| | | | दहेगाव (गोंडी), वापरात नसलेले | |
| १९ | | | वनपाल निवासस्थान Type-II Qtr. मौजा मासोद, वापरात असलेले | ०१ |
| २० | | | लेबर शेड, मौजा- मासोद, वापरात असलेले | ०१ |
| २१ | | | आगारप्रमुख निवासस्थान, बांगडापूर डेपो (वायरलेस यंत्रणेसह) सर्व्हे क्र. २२०RF | ०१ |
| २२ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा बांगडापूर, वापरात असलेले | ०१ |
| २३ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा पांजरा गोंडी, सर्व्हे क्र. १३८PF, वापरात असलेले | ०१ |
| २४ | | | वनपाल निवासस्थान Type-II Qtr. मौजा ब्राम्हणवाडा, नवीन बांधकाम वापरात असलेले | ०१ |
| २५ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा ब्राम्हणवाडा, वापरात नसलेले | ०१ |
| २६ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा धावसा, वापरात नसलेले | ०१ |
| २७ | उपवनसंरक्षक, वर्धा वन विभाग, वर्धा | ईमारत | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा लिंगापूर, वापरात नसलेले | ०१ |
| २८ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा जोगा, वापरात नसलेले | ०१ |
| २९ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा नांदोरा, वापरात नसलेले | ०१ |
| ३० | | | वनपाल निवासस्थान Type-II Qtr. मौजा भिवापूर, वापरात नसलेले | ०१ |
| ३१ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा गारपीट, वापरात असलेले | ०१ |
| ३२ | | | वनपाल निवासस्थान Type-II Qtr. मौजा गारपीट, वापरात नसलेले | ०१ |
| ३३ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा सिंदीविहीरी, वापरात असलेले | ०१ |
| ३४ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा | ०१ |

| अ. क्र. | वन विभागाचे नाव | विवरण | सविस्तर तपशील | मालमत्ता संख्या |
|---|---|---|---|---|
| | | | राहाटी, वापरात नसलेले | |
| ३५ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा मेटहिरजी, वापरात असलेले | ०१ |
| ३६ | | | वनपाल निवासस्थान Type-II Qtr. मौजा धोनोली, वापरात असलेले क्र.१-(वायरलेस यंत्रणेसह) | ०१ |
| ३७ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा धानोली, वापरात असलेले | ०१ |
| ३८ | | | वनरक्षक निवासस्थान Type-I Qtr. मौजा धनोली, वापरात असलेले | ०१ |
| ३९ | | तपासणी नाके | तपासणी नाका मौजा मासोद | ०१ |
| ४० | | | तपासणी नाका मौजा बांगडापूर | ०१ |
| ४१ | | | तपासणी नाका मौजा पांजरा गोंडी, सर्व्हे क्र. १७४ | ०१ |
| ४२ | | | तपासणी नाका आगरगाव ते जोगा रस्ता | ०१ |
| ४३ | | | तपासणी नाका मौजा राहाटी, १ कोढाळी ते बांगडापूर रोडवर | ०१ |
| ४४ | | वॉच टावर | वॉच टॉवर, मौजा ब्राम्हणवाडा, सर्व्हे क्र. २०८ | ०१ |
| ४५ | | | वॉच टॉवर, मौजा मासोद, सर्व्हे क्र. २१४ | ०१ |
| ४६ | | | वॉच टॉवर, मौजा बांगडापूर (पश्चिम), सर्व्हे क्र. २२० | ०१ |
| ४७ | | रोपवाटीका | अस्थाई रोपावाटीका, मासोद | ०१ |
| ४८ | | | अस्थाई रोपावाटीका, मौजा नांदोरा | ०१ |
| ४९ | | लाकूड डेपो | बांगडापूर डेपो | ०१ |
| ५० | | निरीक्षण कुटी | निरीक्षण कुटी, ढगा भवन | ०१ |
| ५१ | | | निरीक्षण कुटी, बांगडापूर डेपो | ०१ |
| ५२ | | | निरीक्षण कुटी, मौजा गारपीट कक्ष क्र. १८६RF | ०१ |
| ५३ | | वाहन | Tata Xenon MH-३२-J-०१९१ | ०१ |
| ५४ | | | Bolero Camper MH-३२-G-०१३४ | ०१ |
| | | एकूण | | ५४ |

**परिशिष्ठ - ४:- बोर व्याघ्र राखीवचे एकसंघ नियंत्रणाकरीता उपलब्ध होणाऱ्या पदांचा संवर्गनिहाय तपशील.**

| अ.क्र. | पदनाम | उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प वर्धा यांचे कार्यालय | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | एकुण आवश्यक पदे | पदाचे स्त्रोत | | |
| | | | उपलब्ध पदे | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) नागपूर यांचेकडुन प्राप्त होणारी पदे | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वजी) नागपूर यांचे कार्यालया कडुन प्राप्त होणारी पदे |
| १ | उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प | ०१ | ०१ | ०० | ०० |
| २ | सहाय्यक वनसंरक्षक | ०२ | ०१ | ०० | ०१ |
| ३ | वनक्षेत्रपाल | ०६ | ०२ | ०४ | ०० |
| ४ | वनपाल | १४ | ०४ | १० | ०० |
| ५ | वनरक्षक | ७० | ३५ | ३५ | ०० |
| ६ | मुख्य लेखापाल | ०१ | ०० | ०१ | ०० |
| ७ | लेखापाल | ०५ | ०२ | ०३ | ०० |
| ८ | लिपीक | ०९ | ०३ | ०६ | ०० |
| ९ | वन सर्व्हेक्षक | ०२ | ०१ | ०१ | ०० |
| १० | वाहन चालक | ०२ | ०२ | ०० | ०० |
| | **एकुण** | **११२** | **५१** | **६०** | **०१** |

## परिशिष्ठ - ५:- बोर व्याघ्र प्रकल्पाचे एकसंघ नियंत्रणा अंतर्गत पुनर्रचनेनंतर प्रशासकीय संरचनेचा तपशील



**परिशिष्ठ - ६:- बोर व्याघ्र प्रकल्पाचे एकसंघ नियंत्रणा अंतर्गत पुनर्रचनेनंतर उपसंचालक, बोर व्याघ्र प्रकल्प यांचे अधिनस्त असणाऱ्या वनपरिक्षेत्र, परिमंडळ, नियतक्षेत्राचा तपशील.**

| अ.क्र. | वनपरिक्षेत्र | परिमंडळ | नियतक्षेत्र |
|---|---|---|---|
| १ | बोरधरण | बोरधरण | बोरधरण |
| २ | | | पेंढरी |
| ३ | | | पूर्व गरमसुर |
| ४ | | | सालई कला |
| ५ | | अडेगांव | अडेगांव |
| ६ | | | नवेगाव |
| ७ | | | सुकळी |
| ८ | | | पश्चिम गरमसुर |
| | **एकूण** | **०२** | **०८** |
| १ | नविन बोर | आमगाव | बोरी |
| २ | | | खोरीखापा |
| ३ | | | सोंडी |
| ४ | | | आमगाव |
| ५ | | नवरगाव | उमरविहरी |
| ६ | | | मेट |
| ७ | | | नवरगाव पूर्व |
| ८ | | | नवरगाव पश्चिम भाग-१ |
| ९ | | | नवरगाव पश्चिम भाग-२ |
| १० | | | नवरगाव उत्तर |
| | **एकूण** | **०२** | **१०** |
| १ | कवडस | अडेगाव | प्रतापगड |
| २ | | | अडेगाव |
| ३ | | | खापानिपानी |
| ४ | | | कवडस |
| ५ | | पेंढरी | नवेगाव |
| ६ | | | पेंढरी |
| ७ | | | देवळी |
| ८ | | | बिबी |
| ९ | | | डेमगा (खुर्द) |
| | **एकूण** | **०२** | **०९** |
| १ | हिंगणी (वन्यजीव) | धानोली | गरमसुर |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | | | उमरझरी |
| ३ | | | डोंगरगाव |
| ४ | | | रायपूर |
| ५ | | | सिंदीविहरी |
| ६ | | बोरगाव गोंडी | मरगसुर |
| ७ | | | सुसूंद |
| ८ | | | मळेगाव (ठेका) |
| ९ | | | ब्राम्हणवाडा |
| १० | | हिंगणी | केळझर |
| ११ | | | हिंगणी |
| १२ | | | रायपूर (जंगली) |
| १३ | | | मळेगाव (ठेका) दक्षिण |
| | **एकूण** | **०३** | **१३** |
| १ | बांगडापूर | गारपीट | धामकुंड पूर्व |
| २ | | | गारपीट |
| ३ | | | पांजरा गोंडी |
| ४ | | | गारपीट पूर्व |
| ५ | | | लिंगा मांडवी |
| ६ | | बांगडापूर | ढगा (उत्तर) |
| ७ | | | ढगा (दक्षिण) |
| ८ | | | आजनडोह पश्चिम |
| ९ | | | बांगडापूर |
| १० | | मासोद | ब्राम्हणवाडा |
| ११ | | | काचनुर |
| १२ | | | खेरवाडा |
| १३ | | | सोनेगाव |
| | **एकूण** | **०३** | **१३** |
| | **एकूण एकंदर** | **१२** | **५३** |